महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत सुविधा महामंडळ (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेसाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन निर्णय क्र. आरएलवाय २०१५/प्र. क्र. १३/परि-५

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ३२,
दि.८ नोव्हेंबर २०१६

वाचा:- १) मा. मुख्यमंत्री व मा. रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.८ जानेवारी २०१५ रोजी झालेली बैठकीचे क्र. आरएलवाय-२०१५/प्र. क्र. १/रेल्वेडेस्क, दि.१४.१.२०१५ रोजी निर्गमीत केलेले इतिवृत्त.

२) राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान दि. २६.६.२०१५ रोजीचा सामंजस्य करार.

**प्रस्तावना**:-

राज्यातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी, रेल्वे प्रकल्पांचा विकास, अंमलबजावणी आणि व्यवहार्यता तपासणे, प्रकल्प क्षमतेत वाढ करणे, प्रकल्प विहीत कालावधीमध्ये पूर्ण व्हावेत तसेच भुसंपादन झाल्यानंतर प्रकल्पबाधितांना मदत व पुनर्वसन त्वरेने होणेसाठी राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे संयुक्त भागीदारीतून महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत सुविधा महामंडळ (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेसाठी मा. मुख्यमंत्री व मा.रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.८.१.२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये तत्वत: मंजूरी दिली होती. त्यानुसार महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत सुविधा महामंडळ (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) ही SPV (Special Purpose Vehicle) स्थापन करणेसाठी राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान दि.२८.६.२०१५ रोजी सामंजस्य करार (Memorandum of Understanding) करणेत आला आहे.

शासनाच्या आर्थिक सहभागातून अंमलात आणावयाचे विविध प्रकल्प Special Purpose Vehicle कंपनीकडे हस्तांतरीत करणेस शासनाने तत्वत: मान्यता दिली आहे.

राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान करावयाच्या संयुक्त उपक्रम करारनामा (Joint Venture Agreement) चे अंतिम प्रारुपानुसार संयुक्त उपक्रम कंपनीचे (Joint Venture Company) चे प्रारंभिक अधिकृत भागभांडवल रक्कम रु. १००.०० कोटी इतके असणार आहे. त्यामध्ये राज्य शासनाचा हिस्सा हा ५०% म्हणजेच रु. ५०.०० कोटी इतका असणार आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य शासन आणि रेल्वे महामंडळ यांचे दरम्यान झालेल्या सामंजस्य करार (Memorandum of Understanding) नुसार महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत सुविधा महामंडळ (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेस प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०८१६४४२८८१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Vidyadhar Avinash Malegaonkar

Digitally signed by Vidyadhar Avinash Malegaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Avinash Malegaonkar
Date: 2016.11.08 16:53:26 +05'30'

**(वि. अ. मालेगांवकर)**
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, १/२ (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली
३) महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई/दक्षिण मध्य रेल्वे,सिकंदराबाद
४) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, छत्रपती शिवाजी टर्मिनस, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) बीयुडी-१,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८) वित्त विभाग, व्यय-८, बीयुडी११, मंत्रालय, मुंबई
९) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती/परि-५

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई